**डिसेबर २००९ ते मार्च २०१० या कालावधीत होमगार्ड स्वयंसेवकांना भत्ते अदा करण्यासाठी अतिरिक्त तरतुद उपलब्ध करुन देण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..........**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग (विशेष),**
शासन निर्णय क्रमांक : एचजीएस- २०१०/प्र.क्र.७६/विशा-८,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक : ११ ऑगस्ट, २०१०.

**वाचावे :-** (१) शासन निर्णय, गृह विभाग (विशेष), क्रमांक एचजीएस २००९/प्र.क्र.६१/विशा ८, दिनांक ८ जानेवारी, २०१०.
(२) महासमादेशक होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : मस/कार्या-४/अर्थ/२०१०/१९९४, दिनांक २५ जून, २०१०.
(३) शासन पत्र, गृह विभाग, क्रमांक : एसयुपी-११०/प्र.क्र. १७२/बीयुडी-१, दिनांक ०२ ऑगस्ट, २०१०.

**प्रस्तावना :-**

सन २००९-१० व २०१०-११ या विर्त्तीय वर्षामध्ये होमगार्ड स्वयंसेवकांना कर्तव्यार्थ प्रलंबित भत्ते अदा करण्यासाठी महासमादेशक होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (२) अन्वये रुपये ५३,५३,२८,०००/- ची मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला. तथापि, सन २०१०-११ या वित्तीय वर्षाकरिता रुपये ३५,१०,७९,०००/- एवढी नियमीत तरतुद मंजुर करण्यात आली असल्याने, पुरवणी मागणीद्वारे रुपये ५३,५३,२८,०००/- ची तरतूद उपलब्ध होण्यासाठीचा प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला. वित्त विभागाने, उक्त प्रयोजनार्थ काही प्रमाणात प्रलंबित भत्ते अदा करण्यासाठी रुपये १५.०० कोटी बाबतची पुरवणी मागणी व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीत सादर करण्यास मान्यता दिली. आता पावसाळी अधिवेशन, २०१० मध्ये रुपये १५.०० कोटी इतक्या रकमेची सादर केलेली पुरवणी मागणीस विधानमंडळाने मान्यता दिली असल्याने प्रशासकीय आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वरील प्रस्तावाचा सर्वांगीण विचार करुन, होमगार्डस्‌ना प्रलंबित भत्ते अदा करण्यासाठी रुपये १५.०० कोटी (रुपये पंधरा कोटी फक्त) एवढी रक्कम याद्वारे मंजूर करण्यास प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

२. या संदर्भातील होणारा खर्च हा, "मागणी क्रमांक : बी-१-२०७० - इतर प्रशासनिक सेवा- (००) (१०७) होमगार्ड- (००) (०१) होमगार्ड - (२०७० ०२८१), २८ - व्यावसायिक व विशेष सेवा" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ या वर्षाकरीत केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा व त्या शिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

६३२

५. याचवेळी शासन असेही निदेश देत आहे की, गृह रक्षक दलातील स्वयंसेवकांना कर्तव्य भत्ता व उपहार भत्त्याचे त्वरित वाटप होण्याच्या दृष्टीने महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्वरीत कार्यवाही करावी. तसेच, स्वयंसेवकांच्या कर्तव्यावरील उपस्थितीचा अहवाल संबंधित पोलीस ठाणे प्रमुख यांनी १५ दिवसात संबंधित जिल्हा समादेशक, होमगार्ड यांच्याकडे सादर करावा. त्यानंतर १५ दिवसाच्या आत भत्ते अदा करण्याची कार्यवाही जिल्हा समादेशक, होमगार्ड कार्यालयाने करावी. पोलीस ठाण्याकडून कर्तव्यावरील उपस्थिती अहवाल प्राप्त न झाल्यास तो प्राप्त करुन घेण्याबाबत जिल्हा समादेशक, होमगार्ड यांनी अप्पर पोलीस अधिक्षक / पोलीस उपायुक्त यांच्याशी व्यक्तीशः संपर्क साधून अहवाल प्राप्त करुन घेण्याबाबत आवश्यक तो पाठपुरावा व कार्यवाही करावी. यापुढे तरतूद उपलब्ध असूनही भत्ते देण्यास विलंब अथवा दिरंगाई झाल्याचे आढळून आल्यास, संबंधित अधिकारी/कर्मचारी हे कारवाईस पात्र राहतील.

६. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ३२४/१०/ व्यय-८, दि. १२.०७.२०१० अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(ज.रा. चव्हाण)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग (विशेष), महाराष्ट्र शासन.

प्रत,

मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
अ.मु.स. (गृह) यांचे स्वीय सहाय्यक.
महासमादेशक, होमगार्ड तथा संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
प्रधान सचिव, (विशेष) यांचे सवीय सहाय्यक.
सह सचिव, (बीयुडी -१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व अप्पर पोलीस अधिक्षक.
समादेशक, होमगार्ड, मुंबई, बृहन्मुंबई.
सर्व जिल्हा समादेशक, होमगार्ड.
समादेशक, मध्यवर्ती प्रशिक्षण संस्था, होमगार्ड, घाटकोपर, मुंबई.
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव, बीयुडी -१ गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
संगणक कक्ष , गृह विभाग, मंत्रालय.शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्याबाबत कार्यवाहीसाठी अग्रेषित.
निवड नस्ती विशा-८.